**महाराष्ट्र शासन**

क्रमांक :-आरजीडी १११९/६०३/प्र.क्र.२६९/१३
सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १.१२.२०११

प्रति,

उप सचिव
गृह विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

विषय :- पोलीस भरतीसाठी यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ प्रमाणपत्र समकक्ष धरणेबाबत.

महोदय,

उपरोक्त विषयांकीत श्री.नडगे सेवा लक्ष्मण यांनी या विभागास पाठविलेला दि.२१.११.२०११ चा अर्ज आवश्यक त्या कार्यवाहीसाठी सोबत जोडून पाठविण्यात येत आहे. अर्जदाराने अर्जात नमूद केल्याप्रमाणे यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठ व राष्ट्रीय मुक्त विद्यालय शिक्षण संस्था, नवी दिल्ली यांची प्रमाणपत्रे शासन सेवेसाठी १० वी / १२ वी परीक्षेशी समकक्ष धरणेबाबत शासन निर्णय सा.प्र.वि दिनांक २०.५.२०११ परिच्छेद १ मध्ये केलेली तरतुद स्वयंस्पष्ट आहे. सदर शासन निर्णयान्वये यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापिठाची पूर्व परीक्षा उत्तीर्ण होऊन पदवी परीक्षेचे प्रथम वर्ष उत्तीर्ण झालेला वा यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठातून पदवी धारण केलेला उमेदवार १० वी /१२ वी च्या शैक्षणिक अर्हतेच्या समकक्ष समजण्याचे शासन आदेश आहेत. पोलीस भरतीमध्ये अशा उमेदवारांना १२ वी उत्तीर्ण नसल्याचे कारण देऊन डावलणे चुकीचे आहे. तरी न्यायालयाचा अवमान झाल्यास संबंधीत अधिकारी जबाबदार राहतील याची नोंद घ्यावी. आपल्या कक्षेतील सर्व क्षेत्रीय अधिका-यांना सूचना द्याव्यात. तसेच या प्रकरणी आपल्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.एमआयएस ०३११/प्र.क्र.६५७/पोल-५-अ वर या कार्यासनाचे अभिप्राय नोंदवून नस्ती विभागास परत पाठविण्यात आलेली आहे. त्यानुसार विभागाने अर्जदारास परस्पर कळवावे. हे पत्र राज्य शासनाच्या www.mah.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध आहे व त्याचा संकेतांक 201112020722380001 असा आहे.

आपला,

(आ.अ.लोपिस)
कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग

सोबत :- वरीलप्रमाणे.

प्रत,

सर्व मंत्रालयीन विभागाचे सचिव, याना विनंती की, त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व संबंधितांना वरीलप्रमाणे सूचना देण्यात याव्यात.

mmj/letter 1.!wp/D-13/230